**मुंबई वाहतूक पोलीस विभागांतर्गत असलेल्या शिक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या सन २०१९-२० च्या वार्षिक उपक्रमासाठी झालेल्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरए-१०१९/प्र.क्र.११३/पोल-८**
दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक :- २१ डिसेंबर, २०१९**

वाचा :-

१. सह पोलीस आयुक्त (वाहतूक), पोलीस आयुक्तालय, मुंबई यांचे दि.२.१२.२०१९ रोजीचे पत्र व त्यासोबतचे सहपत्र
२. सह पोलीस आयुक्त (प्रशासन), पोलीस आयुक्तालय, मुंबई यांचे दि.१०.१२.२०१९ रोजीचे पत्र व त्यासोबतचे सहपत्र

**प्रस्तावना :**

मुंबई वाहतूक पोलीस विभागामधील असलेल्या शिक्षण विभागामार्फत दरवर्षी मुंबई शहरातील वाहतुक नियमन व नियंत्रणाबरोबर अनेक रचनात्मक प्रबोधनात्मक उपक्रम राबविले जातात.मुंबई वाहतुक विभागामधील शिक्षण विभागातर्फे बृहन्मुंबईमध्ये सन १९५७ पासून शालेय विद्यार्थ्यांना रस्ता सुरक्षा दलाचे प्रशिक्षण देण्यात येते. सध्या एकूण ५०५ शाळेमधील सुमारे ६०,०००/- विद्यार्थ्यांना दरवर्षी रस्ता सुरक्षा दल अतंर्गत योजनाबध्दरित्या वाहतूक नियंत्रण व नियमाबाबत प्रशिक्षण देण्यात येते.

२. सदर प्रशिक्षणामध्ये विविध शाळेचे सहभागी विद्यार्थ्यांना योजनाबध्दरित्या वाहतूक नियंत्रण व नियमांचे प्रशिक्षण देण्यात येते. त्यांच्याकडून शिस्तबध्द संचलनाचेही शिक्षण देण्यात येते. तसेच २६ जानेवारी प्रजासत्ताक दिन संचलन कार्यक्रमामध्ये सदर विद्यार्थ्यांचा समावेश असतो. तसेच विद्यार्थ्यांनी रस्ता सुरक्षा दल अंमर्गत तीन वर्षाचा अभ्यासक्रम पूर्ण झाल्यानंतर विद्यार्थ्यांना प्रमाणपत्र वितरीत करण्यात येतात. सदर प्रशिक्षण हे वाहतूक विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांच्यामार्फत दिले जाते. त्यानुसार सदर कार्यक्रम राबविण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मुंबई वाहतूक पोलीस विभागाकडून मुंबई शहरातील शाळांच्या सहभागाने रस्ता सुरक्षा दलांतर्गत दरवर्षी विविध उपक्रम राबविण्यात येतात. मुंबई वाहतूक पोलीस विभागांतर्गत असलेल्या शिक्षण विभागामार्फत राबविण्यात आलेल्या सन २०१९-२०२० च्या वार्षिक उपक्रमासाठी झालेला खर्च **रु.३१,९३,६५०/- (अक्षरी रु. एकतीस लाख त्र्यान्नव हजार सहाशे पन्नास फक्त)** इतक्या खर्चास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मुख्यालेखाशिर्ष " बी-१, २०५५, पोलीस १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२), शहर पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना, (२०५५ ००९७) १३ कार्यालयीन खर्च " या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. विषयाधीन उपक्रमाकरीता झालेला खर्चाचा संपूर्ण तपशील शासनास त्वरीत सादर करावा.

४. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तीका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग ३, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२२११२०९४९५९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dhondu Pawar

Digitally signed by Sudhakar Dhondu Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=370693820257420609f4d474c2024d6ebdc571ea6ad2b769aa743bd3015cb5a3, serialNumber=ee05d69d6f5f431837c7addff9093dd5e97fd9ec63b0bc306c7f049f9d93d36c, cn=Sudhakar Dhondu Pawar
Date: 2019.12.21 12:40:31 +05'30'

**( सु. धों. पवार )**
**अवर सचिव, गृह विभाग**

**प्रति,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त (वाहतूक), वरळी, मुंबई.
३. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
४. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७. उप सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (पोल-८)